स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत क्षमता बांधणी व प्रशासकीय आणि कार्यालयीन खर्चाकरिता निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: स्वमअ-२०२१/प्र.क्र. ११२/नवि-३४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १७ नोव्हेंबर, २०२१.

वाचा:

१) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक:स्वभाअ-२०१५/प्र.क्र.२३/नवि-३४, दि १५.०५.२०१५
२) वित्त विभागाचे निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१
३) वित्त विभागाचे निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१
४) केंद्र शासनाच्या नगरविकास मंत्रालयाचे आदेश क्रमांक F. No. १/७/२०१५-SBM-Part-I (e-file # ९०७३४४८), दिनांक १४ सप्टेंबर, २०२१.

**शासन निर्णय:**

देशातील सर्व शहरे पूर्णपणे स्वच्छ, निरोगी आणि राहण्यायोग्य करणे आणि सर्व नागरिकांना स्वच्छ व चांगले आरोग्य आणि पर्यावरण मिळावे तसेच देशातील सर्व सांविधानिक शहरांना स्वच्छतेची आणि या शहरामधील नागरीकांना घरगुती शौचालयांची सुविधा उपलब्ध करून देणे, या उद्देशाने केंद्र शासनाने "स्वच्छ भारत अभियान (नागरी)" ची अंमलबजावणी सुरु केली आहे. या अभियानाच्या धर्तीवर राज्यामध्ये संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये "स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)" राबविण्यात येत आहे.

२. स्वच्छ भारत अभियानांतर्गत केंद्र शासनाने क्षमता बांधणी व प्रशासकीय आणि कार्यालयीन खर्चाकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात राज्यासाठी वितरीत केलेला पुर्ण व अंतिम हप्त्याचा निधी रुपये ७९,२०,०००/- (रूपये एकोणऐंशी लक्ष वीस हजार फक्त) व त्या प्रमाणात राज्य शासनाचा अनुज्ञेय हिस्सा रुपये ५२,८०,०००/- लक्ष (रूपये बाव्वण लक्ष ऐंशी हजार फक्त) असे एकूण रुपये १,३२,००,०००/- कोटी (रूपये एक कोटी बत्तीस लक्ष फक्त) एवढा निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदरचा खर्च पुढील तक्त्यात नमूद केल्यानुसार संबंधित लेखाशिर्षासमोर दर्शविल्याप्रमाणे त्या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदी मधून भागविण्यात यावा.

| | लेखाशिर्ष | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|
| **अ)** | **महानगरपालिकांना** | **रूपये** |
| १ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (७६) स्वच्छ भारत अभियानासाठी महानगरपालिकांना सहाय्य (केंद्र हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७५२) योजनांतर्गत | ११,०८,८००/- (रूपये अकरा लक्ष आठ हजार आठशे फक्त) |
| २ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९१, महानगरपालिकांना सहाय्य, (००) (७७) स्वच्छ भारत अभियानासाठी महानगरपालिकांना सहाय्य (राज्य हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७६१) योजनांतर्गत | ७,३९,२००/- (रूपये सात लक्ष एकोणचाळीस हजार दोनशे फक्त) |
| ब) | **नगरपरिषद** | |
| १ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, (००) (७८) स्वच्छ भारत अभियानांतर्गत नगरपरिषदांना सहाय्य (केंद्र हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७७९) योजनांतर्गत | ४४,३५,२००/- (रूपये चौव्वेचाळीस लक्ष पस्तिस हजार दोनशे फक्त) |

| | लेखाशिर्ष | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|
| २ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, (००) (७९) स्वच्छ भारत अभियानासाठी नगरपरिषदांना सहाय्य (राज्य हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७८८) योजनांतर्गत | २९,५६,८००/- (रूपये एकोणतीस लक्ष छपन्न हजार आठशे फक्त) |
| **क)** | **नगरपंचायतींना** | |
| १ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९३, नगरपंचायतींना सहाय्य, (००) (०३) स्वच्छ भारत अभियानांतर्गत नगरपंचायतींना सहाय्य (केंद्र हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९७९७) योजनांतर्गत | २३,७६,०००/- (रूपये तेवीस लक्ष स्याहत्तर हजार फक्त) |
| २ | मागणी क्रमांक-एफ-२, २२१७, नगरविकास, (८०) सर्वसाधारण, १९३, नगरपंचायतींना सहाय्य, (००) (०४) स्वच्छ भारत अभियानासाठी नगरपंचायतींना सहाय्य (राज्य हिस्सा), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), (२२१७ ९८०३) योजनांतर्गत | १५,८४,०००/- (रूपये पंधरा लक्ष चौऱ्याऐंशी हजार फक्त) |

३. सदर निधी आहरित करण्यासाठी राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर रकमेचे देयक तयार करावे व ते अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांच्याकडे तात्काळ सादर करून सदर निधी आहरित करून धनादेश प्राप्त करून घेण्यात यावा. सदर निधीचे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थानिहाय वाटप करण्याची कार्यवाही राज्य अभियान संचालकांनी करावी.

४. सदरचा शासन निर्णय हा वित्त विभागाचे शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ व शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. तसेच, या दोन्ही शासन निर्णयातील लागू असलेल्या अटींची पूर्तता होत आहे. केंद्र शासनाकडून निधी प्राप्त झाल्याची खात्री वित्त विभागाचे Sheet No.११(२०२१-२२) वित्त विभाग/अर्थोपाय या अन्वये करण्यात आली आहे.

५. वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/ अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ अन्वये ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले आहेत. सदर शासन निर्णयान्वये केंद्र व राज्य शासनाचा एकूण रूपये १,३२,००,०००/- (रूपये एक कोटी बत्तीस लक्ष फक्त ) इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११११७१५०९०३३२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ajit Sahebrao Palwe

Digitally signed by Ajit Sahebrao Palwe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bcc5dbdaa52955626b8257f1105a8a62ddbd1337948a428b4e4c992e5d3bf423, serialNumber=eeec7a4defed4a9827acaa40b255e88289e62111c82bcdb7dd2fe58860768930, cn=Ajit Sahebrao Palwe
Date: 2021.11.17 15:10:56 +05'30'

**( अ. सा. पालवे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा .मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा .राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, वित्त, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-२, नागपूर.
६. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद संचालनालय, मुंबई.
८. आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
९. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी), मुंबई.
१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
११. अधिदान व लेखाधिकारी, फोर्ट, मुंबई.
१२. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे, मुंबई.
१३. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१४. मुख्य लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१५. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१६. निवडनस्ती, नवि-३४.